सन २००२-२००३ च्या अर्थसंकल्पातील
मंजूर अनुदानातून पहिला हप्ता
(योजनांतर्गत) महाराष्ट्र मेरीटाईम
बोर्डाकडे वर्ग करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक पीएलएन-०८/०१/सीआर-२००/पीआरटी-१,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२, दिनांक: ३० नोव्हेंबर,२००२.

**शासन निर्णय** :- शासन निर्णय गृह विभाग क्रमांक इपीटी- १०९६/ प्र.क्र.१३३/परि-५, दि.२२ नोव्हेंबर, १९९६ अन्वये महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाची स्थापना झाल्यामुळे बंदर संघटनेमार्फत कार्यान्वित होत असलेली योजनांतर्गत व योजनेतर कामे बोर्डामार्फत करण्यात येतात. याकरिता शासनाकडून बोर्डाला अनुदान, अर्थसंकल्प, कर्जे वगैरे देण्याची तरतूद महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड अधिनियम १९९६ च्या कलम ७३ मध्ये आहे. सदर कलमाच्या तरतूदीनुसार महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास सहाय्यक अनुदान देणे शक्य व्हावे याकरिता शासन निर्णय, क्रमांक पीएलएन- ०६९७/सीआर-४३/परि-४ दिनांक १५.७.९७ अन्वये लेखाशिर्ष "३०५१- बंदरे व दिपगृहे" व " ३०५६- अंतर्देशिय जलपरिवहन" या लेखाशिर्षाखाली ( योजनेतर व योजनांतर्गत) उपशिर्ष सन १९९७- १९९८ या आर्थिक वर्षापासून उघडण्यास शासन मंजूरी देण्यात आली आहे.

२. सन २००२- २००३ या वर्षाकरीता पहिला हप्ता म्हणून एकूण रुपये ६,८५,३१,००० (रुपये सहा कोटी पंच्याऐंशी लाख एकतीस हजार फक्त) ( योजनांतर्गत) इतके अनुदान खाली दर्शविल्याप्रमाणे महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे वर्ग करण्याच्या प्रस्तावास शासन याद्वारे मंजूरी देत आहे.

| प्रधान लेखाशिर्ष | सन २००२- २००३ चे मंजूर अनुदान | पहिल्या हप्त्याची रक्कम |
|---|---|---|
| १. मागणी क्र.बी-७, ३०५१, बंदरे व दिपगृहे ०२, लहान बंदरे १९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रम यांना सहाय्य (दोन) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास सहाय्यक अनुदान ( लहान बंदरे विकास (योजनांतर्गत) ( ३०५१- ०७- ०३) | रु.२६,२१,५४,००० | रु.६,५५,३८,००० |
| २. मागणी क्र.बी-३ ३०५६, अंतर्देशिय जलपरिवहन १९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रम यांना सहाय्य ( दोन) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास सहाय्यक अनुदान ( खाडी बंदरे विकास) (योजनांतर्गत) ( ३०५६-००-५५) | रु.१,१९,७२,००० | रु.२९,९३,००० |
| एकूण | रु.२७,४१,२६,००० | रु.६,८५,३१,००० |

३. या शासन निर्णयानुसार मंजूर केलेल्या रक्कमेचा अधिदान व लेखा कार्यालयातील लेख्याशी खर्चमेळ करुन महाराष्ट्र बोर्ड अधिनियम १९९६ च्या कलम ८८ अनुसार ताळेबंद तयार करुन कलम ८९ नुसार पुढील कार्यवाहीसाठी शासनाकडे अहवाल सादर करावा.

४. वरील तरतुदीकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून लेखाधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड हे राहतील व मुख्य कार्यकारी अधिकारी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड हे नियंत्रक अधिकारी राहतील आणि महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे वर्ग केलेली रक्कम अधिदान व लेखा-कार्यालय, मुंबई यांच्याकडे संबंधित लेखाशिर्षाखाली रक्कमेची मागणी करतील.

५. हा आदेश वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर-१२६२/२००२/ व्यय-८, दि.३१.१०.२००२ अन्वये व अनौपचारिक संदर्भ क्र.५९७८/ २००२ दि.२७.११.२००२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. तसेच सदर रक्कम एक कोटीपेक्षा जास्त असल्यामुळे वित्त विभाग परिपत्रक क्र. पी- ५११/ प्र.क्र-१४६/ ९१ अर्थोपाय दि.१७.५.९१ नुसार वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर-१०४६/ अर्थ-१०, दि.१३.११.२००२ अन्वये मुक्त करण्यास परवानगी देण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( मानसी इंदुलकर )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

महालेखापाल-१ ( लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-२, ( लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
अपर मुख्य सचिव ( परिवहन/बंदरे), गृह विभाग.
सचिव, वित्त विभाग ( लेखा व कोषागारे), मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई ( ५ जादा प्रतीसह)
मुख्य बंदर अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई.
सागरी अभियंता, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई.
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ( व्यय-८, अर्थ-१०),
कक्ष अधिकारी, बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
निवडनस्ती.

****